अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन आदेश क्रमांकः एसएलएस-१२१७/(३८३/२०१७)भाग-६/आ.(वर्ग-१)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**दिनांक: - २२ नोव्हेंबर, २०१८.**

**शासन आदेश :-**

जलसंपदा विभागातील खाली नमूद केलेल्या कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांना अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील रुपये १५६००-३९१०० + श्रेणीवेतन (Grade pay) रु.७६००/- या वेतनश्रेणीत खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर आस्थापना मंडळाने शिफारस केल्यानुसार निव्वळ तदर्थ / तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे.

**१. श्री. शरद शंकर दाभाडकर (खुला)(ज्ये.क्र.६४)**

**२. श्री. महेंद्र बळवंत नाकील (खुला)(ज्ये.क्र.६८)**

२. वर नमूद अधिकाऱ्यास खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे :-

१) सदर पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ वरील मा.सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

२) सदर पदोन्नती ज्येष्ठतासूचीसंदर्भात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे श्री.र.दौ. वर्धने व इतर ८ यांनी मूळ अर्ज क्र.१०७८/२०१६, श्री.सु.ब.चव्हाण व इतर २० यांनी मूळ अर्ज क्र.७११/२०१४ व श्री. सं.दि.डोणगावकर यांनी मूळ अर्ज क्र.११०१/२०१५ अन्वये दाखल केलेल्या याचिकांवरील होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील.

३) वरील अधिकाऱ्याची पदोन्नती ही कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील व या पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यांना सदर पदोन्नतीच्या दिनांकापासून ज्येष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

४) त्यांना देण्यात आलेली ही पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

३. पदोन्नत झालेल्या वरील अधिकाऱ्यांची सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | **श्री. शरद शंकर दाभाडकर** | कार्यकारी अभियंता व पदसिध्द अवर सचिव (मोप्र-१) , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. | अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, पुणे. | रिक्त पदी. |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| २. | **श्री. महेंद्र बळवंत नाकील** | कार्यकारी अभियंता, धरण सुरक्षितता संघटना विभाग क्र.१, नाशिक. | अधीक्षक अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (कालवे), नाशिक. | रिक्त पदी. |

४. संबंधीत वरिष्ठ अधिकाऱ्यांनी वरील पदोन्नत अधिकाऱ्यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करावे.

५. सदर पदोन्नत अधिका-यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे/नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहित मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का-बारा, दि.१२.०९.२०१६ मधील तरतूदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

६. वरील पदोन्नत अधिकारी हे नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass1.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरीत अवगत करावे.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२२१५०१३२१८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Gangaram Gangarkar

Digitally signed by Sunil Gangaram Gangarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b2512fdfec4104829bc2f439e33adb2e3f823a285cfade8149e690564bc13f6, cn=Sunil Gangaram Gangarkar
Date: 2018.11.22 15:08:26 +05'30'

**(सु.गं.गांगरकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
४) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव (जलसंपदा)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि)/ सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) सर्व महासंचालक/कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
७) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
८) सर्व अधीक्षक अभियंता (स्थापत्य), जलसंपदा विभाग.
९) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
१०) खाजगी सचिव, मा.मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
११) खाजगी सचिव, मा.राज्य मंत्री (जलसंपदा)
१२) संबंधीत अधिकारी. (कार्यालय प्रमुखामार्फत)
१३) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१४) सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१५) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.